महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना
२०१९ या योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग,**
**शासन निर्णय क्र. अर्थसं- ०१२०/ प्र.क्र.२७/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ६ मार्च, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा १२१९/प्र.क्र.१५७/२-स, दि.२७.१२.२०१९
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. अर्थसं-०१२०/प्र.क्र.२७/२-स, दि.५.३.२०२०

**प्रस्तावना :-**

दि.१.४.२०१५ ते दि. ३१.३.२०१९ पर्यंतच्या कालावधीसाठी अल्पमुदतीचे पीक कर्ज घेतलेल्या, तसेच, या कालावधीत अल्पमुदतीच्या पीक कर्जाचे पुनर्गठन / फेरपुनर्गठन केलेल्या शेतक-यांना दिलासा देण्यासाठी "महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९" ही कर्जमुक्ती योजना संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आली आहे. सदर योजनेचा लाभ पात्र लाभार्थ्यांना तातडीने दयावयाचा आहे. सदर प्रयोजनासाठी आकस्मिकता निधीतून टप्प्याटप्प्याने मंजूर झालेला रु.१०,००० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर प्रयोजनासाठी अतिरिक्त रु.२,००० कोटी इतका निधी मंजूर झालेला आहे. सदर मंजूर निधीतून रु.५०० कोटी संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले असून उर्वरित रु.१,५०० कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९- (२४३५ ०१४२)" या योजनेअंतर्गत सन २०१९-२० साठी अतिरिक्त रु.२,००० कोटी निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदर निधीतून रु.१,५०० कोटी (रुपये एक हजार पाचशे कोटी) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद खर्च करण्यासाठी (V0004) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन), सहकार आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी.

३. सदरहू रक्कम मागणी क्र. व्ही-०२, मुख्य लेखाशिर्ष "२४३५-- इतर कृषिविषयक कार्यक्रम, ६० - इतर, १०१ -- शेतक-यांसाठी कर्ज माफी योजना, (००) (०३) महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना- २०१९ (राज्य स्तर) (कार्यक्रम), (२४३५ ०१४२)-३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १३६/२०२०/ व्यय-२, दि.५.३.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००३०६१३४३५४२२०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.03.06 13:47:19 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री, सहकार यांचे खाजगी सचिव
३) मा. विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य (सर्व)
४) मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव
५) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
८) महालेखापाल (लेखा परिक्षण), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१०) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
११) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१२) कार्यासन अधिकारी (व्यय-२ / अर्थ- १३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४) निवडनस्ती